**राज्य रोजगार हमी योजनेअंतर्गत घेण्यात येणा-या जवाहर / धडक सिंचन विहीरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत वर्ग करण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विहीर-२०१४/प्र.क्र.६/रोहयो-५**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २२ डिसेंबर, २०१४

वाचा

**१) शासन निर्णय क्रमांकः योजना-२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दि.२३/१/२०१४.**
**२) शासन परिपत्रक क्रमांकः योजना-२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दि.२८/२/२०१४.**
**३) शासन परिपत्रक क्रमांकः योजना-२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दि.१६/४/२०१४.**
**४) शासन परिपत्रक क्रमांकः योजना-२०१३/प्र.क्र.१२३/रोहयो-५, दि.२/७/२०१४.**

**प्रस्तावना -**

राज्य रोजगार हमी योजनेंतर्गत वैयक्तिक लाभाच्या योजनेखाली घेण्यात येणा-या जवाहर विहीर/धडक सिंचन विहीर योजनेतील प्रगतीपथावरील अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच लहान व सिमांत शेतकरी या प्रवर्गातील पात्र लाभार्थ्यांच्या विहीरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र या योजने अंतर्गत वर्ग करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. याबाबत असे निदर्शनास आले आहे की, अनसुचित जाती, अनुसूचित जमाती आणि लहान व सिमांत शेतकरी प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या प्रगतीपथावरील विहीरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र योजने अंतर्गत वर्ग करण्यात आल्या आहेत अशा विहीरींना आता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहेत. तथापि २३ जानेवारी, २०१४ ते आतापर्यंत काही लाभार्थ्यांनी विहीरींची ८० ते ९० टक्के कामे पूर्ण केली आहेत. परंतू अशा लाभार्थ्यांना दि.२३/१/२०१४ च्या शा.नि. नुसार अनुदान वाटप करण्यात आलेले नाही. तसेच या विहीरी दिनांक २३/१/२०१४ नुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र योजनेत वर्ग झालेल्या असल्याने संबंधित गट विकास अधिकारी यांनी अनुदान वाटप करण्यास असमर्थता दर्शविली आहे. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र योजनेत या विहीरींना प्रशासकीय मान्यता दिलेला दिनांक नंतरचा असल्याने व नरेगा अंतर्गत च्या विहीत मार्गदर्शक सुचनेनुसार अद्याप कार्यवाही झालेली नसल्यामुळे लाभार्थ्यांना नरेगातून देखील अनुदान मिळत नाही. असे लाभार्थी आता अनुदानाची मागणी करीत आहेत. तरी याबाबत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र अंतर्गत वर्ग केलेल्या विहीरींच्या बाबतीत अद्याप प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही प्रलंबित असल्याने लाभार्थ्यांना निधी वितरीत करण्यात आलेला नाही. तरी अशा लाभार्थ्यांना अनुदान वाटपाबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**

रोजगार हमी योजने अंतर्गतच्या जवाहर / धडक सिंचन विहीर कार्यक्रमा अंतर्गत अनसुचित जाती, अनुसूचित जमाती आणि लहान व सिमांत शेतकरी प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या प्रगतीपथावरील विहीरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र योजने अंतर्गत वर्ग करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. अशा विहीरी वर्ग करण्याची कार्यवाही पूर्ण करण्यासाठी दिनांक ३१ मार्च, २०१५( Cut off date) निश्चित करण्यात येत आहे. त्यामुळे विहीरी वर्ग करण्याची कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३१/३/२०१५ पर्यंत पूर्ण करणे बंधनकारक आहे.

२. रोजगार हमी योजने अंतर्गतच्या जवाहर / धडक सिंचन विहीर कार्यक्रमा अंतर्गत अनसुचित जाती, अनुसूचित जमाती आणि लहान व सिमांत शेतकरी प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या प्रगतीपथावरील विहीरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र योजने अंतर्गत वर्ग करण्यात येऊन त्यांना प्रशासकिय मान्यता नंतर देण्यात आली आहे. अशा विहीरींची कामे लाभार्थ्यांनी दिनांक २३ जानेवारी, २०१४ नंतर केलेली असतील तथापि त्यांना अद्याप अनुदान वाटप करण्यात आलेले नसेल अशा लाभार्थ्यांच्या बाबतीत प्रशासकिय मान्यता दिलेला दिनांक अथवा ३१.३.२०१५ यापैकी जो अगोदरचा दिनांक असेल त्या दिनांका पर्यंत विहीरीच्या झालेल्या कामाचे मुल्यांकन करण्यात यावे व देय अनुदान जवाहर/धडक सिंचन विहीर योजनेतून देण्याची कार्यवाही संबंधित गट विकास अधिकारी यांनी करावी.

३. तसेच यानंतर अशा विहीरींच्या बाबतीत प्रशासकिय मान्यता दिलेला दिनांक अथवा ३१.३.२०१५ नंतर देय होणा-या निधी वितरणाची कार्यवाही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना -महाराष्ट्र योजनेच्या मार्गदर्शक सुचने नुसार करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२३१४४६५९३०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.01.01 16:24:16 +05'30'

**( आर. विमला )**
**उप सचिव (रोहयो),महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा .राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई § ४०० ०३२.
३. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव

४. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव.

७. सर्व विभागीय आयुक्त.

८. आयुक्त महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र, नागपूर.

९. सर्व जिल्हाधिकारी.

१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

११. सर्व कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे, जिल्हा परिषद.

१२. मा. सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

१३. मा. प्रधान सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

१४. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन अधिकारी, नियोजन /रोहयो विभाग , मंत्रालय, मुंबई- ३२.

१५. सहायक संचालक (रोहयो -७).

१६. निवडनस्ती - रोहयो-५.